**किनारी अभियंता सार्वजनिक बांधकाम मंडळ, वांद्रे, मुंबई यांच्या अधिपत्याखालील विभाग व उपविभागीय कार्यालये मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, कोकण यांच्या अधिपत्याखाली आणणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक बांधकाम विभाग,**
**शासन निर्णय क्र.ईएसटी-२०२४/प्र.क्र.६१/प्रशासन-१**
मंत्रालय, मुंबई -४०० ०३२.
दिनांक :- १६ ऑगस्ट, २०२४.

**प्रस्तावना :-**

मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, मुंबई यांच्या अधिपत्याखाली किनारी अभियंता सार्वजनिक बांधकाम मंडळ, वांद्रे, मुंबई हे कार्यालय सद्य:स्थितीत कार्यान्वित आहे. किनारी अभियंता सार्वजनिक बांधकाम मंडळ, वांद्रे, मुंबई या कार्यालयातील कामांचा आवाका कमी असल्यामुळे सदर कार्यालयाच्या अधिनस्त असलेली विभाग व उपविभागीय कार्यालये मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, कोकण यांच्या अधिपत्याखाली आणण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, मुंबई यांच्या अधिपत्याखालील किनारी अभियंता सार्वजनिक बांधकाम मंडळ, वांद्रे, मुंबई यांच्या अधिनस्त असलेली सर्व विभाग व उपविभागीय कार्यालये मंजूर पदांसह शासनावर कोणताही आर्थिक भार पडणार नाही या अटीच्या अधिन राहून मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, कोकण यांच्या अधिपत्याखाली आणण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे. त्यानुसार मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, कोकण यांच्या अधिपत्याखालील कार्यालयाची सुधारित रचना पुढीलप्रमाणे राहील :-

<table>
<tr><th>प्रादेशिक विभाग कार्यालय</th><th>मंडळ कार्यालय</th><th>विभाग कार्यालय</th><th>उपविभाग कार्यालय</th></tr>
<tr><td rowspan="5">मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, कोकण</td><td rowspan="5">अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, रायगड</td><td rowspan="5">पत्तन अभियंता, पत्तन अभियांत्रिकी विभाग (उत्तर), कोकण भवन</td><td>सहायक पत्तन अभियंता उपविभाग, अलिबाग</td></tr>
<tr><td>सहायक पत्तन अभियंता उपविभाग, श्रीवर्धन</td></tr>
<tr><td>सहायक पत्तन अभियंता, उपविभाग, अंधेरी, मुंबई</td></tr>
<tr><td>सहायक पत्तन अभियंता उपविभाग, वांद्रे, मुंबई</td></tr>
<tr><td>सहायक पत्तन अभियंता उपविभाग, ठाणे</td></tr>
</table>

| | | | |
|---|---|---|---|
| | अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, रत्नागिरी | पत्तन अभियंता विभाग, रत्नागिरी | सहायक पत्तन अभियंता भगवती बंदर उपविभाग, रत्नागिरी |
| | | | सहायक पत्तन अभियंता खाण व सर्वेक्षण उपविभाग, रत्नागिरी |
| | | | सहायक पत्तन अभियंता दापोली उपविभाग, दापोली |
| | | | सहायक पत्तन अभियंता पाणलोट बंधारा उपविभाग, रत्नागिरी |
| | अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, सिंधुदुर्ग | सिंधुदुर्ग पत्तन विभाग, सिंधुदुर्ग ओरस | पत्तन उपविभाग वाघोटन, कुडाळ |
| | | | पत्तन उपविभाग, मालवण |
| | | | पत्तन उपविभाग, देवगड |

२. किनारी अभियंता सार्वजनिक बांधकाम मंडळ, वांद्रे, मुंबई या कार्यालयातील अधीक्षक अभियंता या पदाबाबत स्वतंत्रपणे निर्णय घेण्यात येईल. तसेच किनारी अभियंता सार्वजनिक बांधकाम मंडळ या कार्यालयातील उर्वरित पदे मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, मुंबई यांनी त्यांच्या अधिपत्याखालील कार्यालयात आवश्यकतेनुसार समावेशन करणेबाबत कार्यवाही करावी.

तसेच किनारी अभियंता सार्वजनिक बांधकाम मंडळ या कार्यालयातील सर्व कार्यालयीन माहिती/ दस्तावेज/नस्त्या मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, कोकण यांना हस्तांतरीत करण्याची कार्यवाही मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, मुंबई कार्यालयामार्फत करण्यात यावी.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संगणक संकेतांक २०२४०८१६१६३४३२६८१८ असा आहे. हा आदेश डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

SUDEEP SAHADEO REWALE

Digitally signed by SUDEEP SAHADEO REWALE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PUBLIC WORKS DEPARTMENT, 2.5.4.20=41570e676233403355caab8cc6f4cb08480e2e80c6afc2b733ca211905e1d434, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=B5B2DA9CB10BA8C6D55247B5E56FE2206FFE50CB862E223A178F18C4C5BF7C34, cn=SUDEEP SAHADEO REWALE
Date: 2024.08.16 16:50:25 +05'30'

**( सुदिप सहदेव रेवाळे )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति :-**

१) मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, मुंबई/कोकण.

२) किनारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, वांद्रे, मुंबई.

३) अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, रायगड, रत्नागिरी, सिंधुदुर्ग

४) पत्तन अभियंता, पत्तन अभियांत्रिकी विभाग (उत्तर), कोकण भवन.

५) पत्तन अभियंता विभाग, रत्नागिरी.

६) सिंधुदुर्ग पत्तन विभाग, सिंधुदुर्ग ओरस.

**प्रत :-**

१) महालेखापाल-१ (लेखापरीक्षा) / (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, मुंबई.

२) महालेखापाल -२ (लेखापरीक्षा) / (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, नागपूर.

३) अपर मुख्य सचिव (सा.बां.) / सचिव (रस्ते) / सचिव (बांधकामे), सार्वजनिक बांधकाम विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.

४) जिल्हा कोषागार / उप कोषागार अधिकारी, अकोला.

५) सर्व सह सचिव / उप सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई.

६) कार्यासन अधिकारी, सेवा-१/ सेवा-२/ सेवा-३/ सेवा-४/अर्थसंकल्प-१ व अर्थसंकल्प-३, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई-४०००३२.

७) निवडनस्ती.